राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत सहा विभागीय संस्था व ३६ जिल्हा प्रशिक्षण संस्थांकरिता सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता, देण्यात येणाऱ्या प्रशासकीय प्रशिक्षणाकरिता मंजूर आराखडा

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक: यशदा २०१५/प्र.क्र.९४/१५/१२-अ,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १४ सप्टेंबर, २०१५

**संदर्भ :-** १. या कार्यासनाचा सम क्रमांकाचा दि.,१०.८.२०१५ चा शासन निर्णय.
२.संचालक, राप्रनिमूयं, यशदा पुणे यांचे क्र.राप्रनिमूयं/शा.नि.सु./२०१५-१६ दि.१.९.२०१५ चे पत्र.

**शासन आदेश :-**

राज्य प्रशिक्षण धोरण २०११ नुसार संपूर्ण राज्यामध्ये वर्ग -१ ते वर्ग- ४ च्या अधिकारी कर्मचारी यांचे पायाभूत प्रशिक्षण, पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण, उजळणी प्रशिक्षण, बदलीनंतरचे प्रशिक्षण व नवीन विषयाची तोंडओळख या ५ प्रकारचे प्रशिक्षण घेण्याचे निश्चित झाले आहे . सन २०१५-१६ या कॅलेंडर वर्षाकरिता KRA चे उद्दिष्ट ५५,००० प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण देण्याचे निश्चित करण्यात आल्यानुसार शासनाने सर्वसाधारणपणे सदर उद्दिष्टाची पूर्तता होण्याकरिता शासनस्तरावर निर्णय घेऊन, संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थाकरिता एकूण १००० प्रशिक्षणार्थी याप्रमाणे, ५ दिवस उजळणी प्रशिक्षण कार्यक्रम याप्रमाणे, रु. १५००/- च्या प्रशिक्षण शुल्काच्या मर्यादेत रु.४.५० /- कोटी व ३६ जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थाकरिता एकूण ७०० प्रशिक्षणार्थी याप्रमाणे ३ दिवस उजळणी प्रशिक्षणाकरिता, रु. १०००/- च्या प्रशिक्षण शुल्काच्या मर्यादेत रु.७.५६ /- कोटी अशा एकूण रु. १२०६.०० /- (अक्षरी रुपये बारा कोटी, सहा लाख फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येऊन, उपलब्ध निधीच्या मर्यादेत संस्थांना प्रथम टप्प्यात निधी वितरित करण्यात आला आहे.

२. आता संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयास अनुसरून, संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा यशदा पुणे, यांनी सन २०१५-१६ या वर्षासाठी प्रशिक्षणाचे कॅलेडर तयार केले असून त्यात पायाभूत प्रशिक्षण वर्ग -३ करिता, १२ दिवस व वर्ग-४ करिता ६ दिवसाचे पायाभूत प्रशिक्षण, त्याचप्रमाणे नवीन विषय तोंड ओळख प्रशिक्षण Orientation Training वर्ग-२ व वर्ग-३ करिता १ दिवस याप्रमाणे प्रशिक्षण कार्यक्रमाची आखणी करुन शासनास कळविले आहे. सदर नियोजनात पायाभूत प्रशिक्षणावर भर देण्यात आला आहे. केंद्र शासनाच्या DOPT च्या सूचनांनुसारही राज्यातील नवनियुक्त कर्मचा-यांना पायाभूत प्रशिक्षण देणे आवश्यक ठरविण्यात आले आहे.

३. त्याचप्रमाणे, सन २०१५-१६ या कॅलेंडर वर्षाकरिता KRA चे उद्दिष्ट ५५,००० प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण देणे, असे ठरविण्यात आले आहे. याकरिता, संचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण मूल्यामापन

यंत्रणा, यशदा पुणे, याच्यांकडून शासनास प्राप्त झालेल्या प्रशिक्षण आराखडयानुसार, सहा विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था व ३६ जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थामध्ये सन २०१५-१६ या वर्षामध्ये, खाली नमूद केल्यानुसार प्रशिक्षण घेण्यात यावे.

**अ. पायाभूत प्रशिक्षण वर्ग -३ करिता, १२ दिवस**

**ब. नवीन विषय तोंड ओळख प्रशिक्षण ( Orientation Training ) वर्ग-२ व वर्ग-३ करिता, १ दिवस,**

**क. उजळणी प्रशिक्षण वर्ग-३ करिता ५ दिवस.**

**ड. पायाभूत प्रशिक्षण वर्ग-४ करिता, ६ दिवस,**

उपरोक्त प्रशिक्षण आराखडयानुसार सर्व संस्थांनी संचालक, राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा यशदा पुणे, यांच्या मार्गदर्शनाखाली यशदाने तयार केलेल्या सन २०१५-१६ साठीच्या प्रशिक्षण आराखडयानुसार व यशदाच्या सूचनांनुसार प्रशिक्षण घेण्याची कार्यवाही करावी. तसेच, प्रत्येक महिन्यात प्रशिक्षण कार्यक्रमांच्या अनुषंगाने, संस्थामध्ये घेण्यात आलेल्या प्रशिक्षणाच्या प्रकारानुसार, प्रशिक्षणार्थी यांची संख्या नमूद करून शासनास अहवाल सादर करण्यात यावा. संस्थेमध्ये घेण्यात आलेल्या प्रशिक्षणाची संख्या संचालक, राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा यशदा पुणे, यांच्याकडून प्रमाणित करुन, त्यांच्यामार्फत शासनाकडे निधी मागण्यात यावा. त्यानंतर शासन सर्व विभागीय व जिल्हा संस्था यांना, निधी उपलब्ध करून देण्याची कार्यवाही करेल.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१४१२१४३२८६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridas Bhogle

Digitally signed by Santosh Haridas Bhogle
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Haridas Bhogle
Date: 2015.09.14 12:18:44 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति -**

१. महासंचालक, यशदा, बाणेर रोड, पुणे-४११ ००७.
२. विभागीय आयुक्त,( सर्व विभाग ).
३. जिल्हाधिकारी, ( सर्व जिल्हाधिकारी ).
४ . उप महासंचालक, राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा , यशदा, पुणे.
५. संचालक, राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, पुणे.
६. सर्व विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थां.
७. सर्व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था.
८. वरिष्ठ स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव ( सेवा ) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई-४०००३२.
९. नियोजन विभाग, कार्यासन -१४४३ , वित्त विभाग, कार्यासन - व्यय -४, अर्थ - १० मंत्रालय मुंबई-४०००३२.
१०. निवड नस्ती-१२-अ, साप्रवि, मंत्रालय, मुंबई-३२.